**मुंबई, पुणे व नाशिक-त्र्यंबकेश्वर मध्ये सीसीटीव्ही यंत्रणा कार्यान्वित करण्यासाठी मे. PwC या कंपनीच्या सल्लागारांना मानधन/ मुदतवाढ / नियुक्ती करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र. सीसीटी ३६१५/ प्र क्र ९३/ पोल-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, २ रा मजला, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २९, मे २०१५.

<u>वाचा</u> : १) माहिती तंत्रज्ञान विभाग, शासन निर्णय क्र. मातंस २०११/प्र क्र १२५/३९, दि. २३.९.२०१३.
२) माहिती तंत्रज्ञान विभाग, शासन निर्णय क्र. २१५६/फाईल/डीआयटी/२०१२, दि. २१.९.२०१२.
३) माहिती तंत्रज्ञान विभाग, शासन निर्णय क्र. एमएच-९/१७९/२०१३- डिआर-डिआयटी(एमएच) -डिआयटी (एमएच), दि.२.११.२०१३.
४) गृह विभाग, शासन निर्णय क्र. आयएसएस १०१४/प्र. क्र. २१९/विशा-४, दि. ३१.१२.२०१४.
५) माहिती तंत्रज्ञान विभाग, शासन निर्णय क्र. GAD-मातंस ०८०/४/२०१४-O/o DIRECTORATE OF IT-DIT (MH), १.७.२०१४.
६) असोशिएट डायरेक्टर, मे. प्राईसवॉटरहाऊस कुपर्स लि. यांचे दि. ४.३.२०१५ व दि. २०.४.२०१५ रोजीचे पत्र.
७) गृह विभाग, प्रकल्प अंमलबजावणी समितीचे दि. २४.४.२०१५ रोजीचे इतिवृत्त.

**<u>प्रस्तावना :</u>**

गृह विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या मुंबई, पुणे आणि पिंपरी चिंचवड तसेच नाशिक-त्र्यंबकेश्वर येथील सीसीटीव्ही प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी नेमलेल्या सल्लागाराच्या कामकाजासंबंधी व त्यांना मुदतवाढ देण्यासाठी शासन निर्णय दि. ३१.१२.२०१४ अन्वये गृह विभागाचे सचिव (विशेष), गृह विभाग यांच्या अध्यक्षतेखाली प्रकल्प अंमलबजावणी समिती (Project Implementation Committee) गठित करण्यात आली होती. सदर समितीची प्रधान सचिव (विशेष) यांच्या अध्यक्षतेखाली दि. २४.४.२०१५ रोजी बैठक आयोजित करण्यात आली. सदर बैठकीत गृह विभागांतर्गत विविध ठिकाणच्या सीसीटीव्ही प्रकल्पांकरीता मे. PwC कंपनीच्या सल्लागारास मुदतवाढ/मानधन/ नियुक्ती देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :</u>**

गृह विभागांर्तत राबविण्यात येणाऱ्या सीसीटीव्ही प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी नेमलेल्या मे. PwC या कंपनीच्या सल्लागाराच्या कामकाजाचा आढावा घेवून व सल्लागारास मुदतवाढ/ मानधन/ नियुक्ती देण्यासाठी गृह विभागाच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीने दि.२४.४.२०१५ रोजीच्या बैठकीमध्ये मान्यता दिली आहे. त्यानुसार खालील प्रस्तावांना शासनाची मंजूरी देण्यात येत आहे.

१) पुणे सीसीटीव्ही प्रकल्पासाठी मे. PwC ने सन २०१३ ते आतापर्यंत केलेल्या अर्धवेळ तत्वावर प्रकल्प देखरेखी बाबतचे वरीष्ठ सल्लागारचे (नोव्हे. २०१३ ते एप्रिल २०१५ एकुण १८ महिने) चार महिन्याचे मानधन अनुज्ञेय करण्यात येत आहे.

२) पुणे सीसीटीव्ही प्रकल्पाच्या दि.१.५.२०१५ ते दि.३०.४.२०१६ या कालावधीतील देखरेखीसाठी वरीष्ठ सल्लागार यांची पुर्णवेळ कालावधीसाठी नियुक्ती करण्यात येत आहे.

३) नाशिक-त्र्यंबकेश्वर सीसीटीव्ही प्रकल्पाचे RFP व Bid-Process management संपुष्टात आल्याने दि. २९.१०.२०१३ रोजीच्या उच्चस्तरीय शक्तीप्रदान समितीच्या बैठकीतील निर्णयास अनुसरुन मे. PwC कंपनीचे वरीष्ठ सल्लागाराचे चार महिन्याचे मानधन अनुज्ञेय करण्यात येत आहे.

४) नाशिक-त्र्यंबकेश्वर सीसीटीव्ही प्रकल्पासाठी दि.१.५.२०१५ ते दि.३१.१०.२०१५ या कालावधीसाठी मे. PwC या कंपनीच्या एका वरीष्ठ सल्लागाराची पुर्णवेळ नेमणुक करण्यात येत आहे.

५) मुंबई सीसीटीव्ही प्रकल्पाच्या देखरेखीसाठी मे. PwC कंपनीच्या वरीष्ठ सल्लागाराचे दि.१.१.२०१५ ते दि.३०.४.२०१४ या कालावधीचे पुर्णवेळ मानधन अनुज्ञेय करण्यात येत आहे.

६) मुंबई सीसीटीव्ही प्रकल्पाच्या देखरेखीसाठी दि.१.५.२०१५ ते दि.३०.४.२०१६ कालावधीसाठी मे. PwC या कंपनीच्या एका प्रधान सल्लागाराची अर्धवेळ कालावधीसाठी व दोन वरीष्ठ सल्लागारांची पुर्णवेळ कालावधीसाठी नेमणुक करण्यात येत आहे.

२. सदरहू मानधन हे संदर्भाधीन क्र. ३ वरील दि.२.११.२०१३ रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदींनुसार देय असेल. मे. PwC या कंपनीच्या सल्लागारांना मानधन अदा करण्यासाठी होणारा खर्चाचे वितरण पोलीस महासंचालक, म. रा. मुंबई हे करतील.

३. प्रस्तुत प्रकरणी होणारा खर्च पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अधिनस्त असलेल्या "२०५५-पोलीस, (००) १०९, जिल्हा पोलीस, (००) (०१) जिल्हा पोलीस बल, १३, कार्यालयीन खर्च (२०५५ ०१६८)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून तो सन २०१५-१६ या आर्थिक वर्षातील मंजुर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५२९१८२८४३६१२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kailas Arjun Gaikwad

Digitally signed by Kailas Arjun Gaikwad
DN: CN = Kailas Arjun Gaikwad, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.05.29 18:44:27 +05'30'

**(कैलास गायकवाड)**
उप सचिव, गृह विभाग

**प्रति,**

१) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

२) अपर मुख्य सचिव (माहिती तंत्रज्ञान), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) प्रधान सचिव, उद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
यांस विनंती करण्यात येते की, मे. PwC या सल्लागार कंपनीचे मानधन अदा करण्याबाबतची कार्यवाही आपल्या स्तरावर करण्यात यावी.
६) महालेखापाल महाराष्ट्र (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र,१/२ मुंबई/ नागपूर.
७) महालेखापाल महाराष्ट्र (लेखा परिक्षा), महाराष्ट्र ½ मुंबई/ नागपूर.
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१०) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
११) मे. प्राईसवॉटरहाऊस कुपर्स लि., मुंबई.
१२) गृह विभाग, कार्यासन बीयुडी-१, मंत्रालय, मुंबई.
१३) निवडनस्ती, पोल-३, गृह विभाग, मुंबई.